**गोकुळपेठ मार्केट, मौ. गाडगा, खसरा क्र. २८/१, व मौ. अंबाझरी येथील खसरा क्र.४० येथील नागपूर सुधार प्रन्यास सांस्कृतिक संकुल येथील इमारतीचे पुनर्विकास व नूतनीकरणाच्या प्रकल्पासाठी भुभाटक आकारण्यास शिथिलता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.-नासुप्र १६२३/प्र.क्र.१११/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २३ मे, २०२५.

**वाचा :-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.नासुप्र १६२३/प्र.क्र.१११/नवि-२६, दि. २१ जुलै, २०२३
२) नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाचा ठराव क्र.१४/१२२२(तहकूब)/११.१२.२०२४/SE/DO (W), दि.११ डिसेंबर, २०२४.
३) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र. का.अ/४१५५ दि. ०५ फेब्रुवारी, २०२५.
४) नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाचा ठराव क्र.२०/१२२४, दि. १० फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना:-**

गोकुळपेठ मार्केट येथे नागपूर सुधार प्रन्यास व महानगरपालिका यांच्या संयुक्त विद्यमाने ५०-५० प्रॉफिट शेअरिंग आधारावर तसेच Design, Build, Finance, Operate, Maintain And Sale (DBFOMS) तत्वावर प्रकल्प विकास करण्यास राज्य शासनाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. याकरीता या शासन निर्णयान्वये सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांच्या अध्यक्षतेखाली व आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली १४ सदस्यांची समिती गठीत करण्यात आली आहे. या समितीस प्रकल्प आर्थिकदृष्ट्या सुसाध्य होण्यासाठी निर्णय घेण्याचे अधिकार देण्यात आले.

२. त्याअनुषंगाने संदर्भ क्र. ३ व ४ येथील नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाच्या ठरावाद्वारे प्राप्त मंजूरीनंतर सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये -

(अ) गोकुळपेठ मार्केट, मौ. गाडगा, खसरा क्र. २८/१, या जागेवर नागपूर सुधार प्रन्यास व महानगरपालिका यांचे संयुक्त माध्यमातून प्रॉफीट शेअरिंग प्रणालीमध्ये Design, Build, Finance, Operate, Maintain And Sale (DBFOMS) तत्वावरील प्रकल्पाची आर्थिक व्यवहार्यता सुसाध्य होण्याच्या दृष्टीने नागपूर सुधार प्रन्यास जमिन विनियोग १९८३ च्या नियम ९ मध्ये नमूद केल्यानुसार भुभाटक आकारण्यासंदर्भात अटीस नियम २६ अन्वये राज्य शासनास प्राप्त अधिकारानुसार विशेष बाब म्हणून शिथिलता देण्यात यावी. तसेच

(ब) मौ. अंबाझरी येथील खसरा क्र.४० येथील नागपूर सुधार प्रन्यास सांस्कृतिक संकुल येथील इमारतीचे पुनर्विकास व नूतनीकरणाच्या Design, Build, Finance, Operate, Maintain And Sale (DBFOMS) तत्वावरील प्रकल्पाची आर्थिक व्यवहार्यता सुसाध्य होण्याच्या दृष्टीने नागपूर सुधार प्रन्यास जमिन

विनियोग १९८३ च्या नियम ९ नुसार भुभाटक आकारण्यासंदर्भात अटीस नियम २६ अन्वये राज्य शासनास प्राप्त अधिकारानुसार विशेष बाब म्हणून शिथिलता देण्यात यावी, असे प्रस्ताव शासन मंजुरीकरीता सादर केले आहेत. या प्रस्तावांना राज्य शासनास प्राप्त अधिकारान्वये मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाने संदर्भ क्र. ३ व ४ येथील ठरावाद्वारे दिलेल्या मान्यतेनुसार सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांनी संदर्भाधीन पत्र क्र.१ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने-

(अ) गोकुळपेठ मार्केट येथे नागपूर सुधार प्रन्यास व महानगरपालिका यांच्या संयुक्त विद्यमाने ५०-५० प्रॉफिट शेअरिंग आधारावर तसेच Design, Build, Finance, Operate, Maintain And Sale (DBFOMS) तत्वावर राबविण्यात येणाऱ्या मौ. गाडगा, खसरा क्र. २८/१ येथील गोकुळपेठ मार्केट प्रकल्प आर्थिक व्यवहार्यता सुसाध्य होण्याच्या दृष्टीने नागपूर सुधार प्रन्यास जमिन विनियोग १९८३ च्या नियम ९ नुसार देय असलेल्या रु.५०.८८ कोटी भुभाटक आकारण्यास राज्य शासनास नियम २६ अन्वये प्राप्त अधिकारानुसार विशेष बाब म्हणून शिथिलता देण्यात येत आहे.

(ब) मौ.अंबाझरी येथील खसरा क्र.४० येथील नागपूर सुधार प्रन्यासच्या इमारतीचे पुनर्विकास व नूतनीकरण प्रकल्पासाठी नागपूर सुधार प्रन्यास जमिन विनियोग १९८३ च्या नियम ९ नुसार देय असलेल्या रु.२५.३४ कोटी इतक्या भुभाटक आकारण्यास राज्य शासनास नियम २६ अन्वये प्राप्त अधिकारानुसार विशेष बाब म्हणून अन्वये शिथिलता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०५२३१२०८१०५६२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.05.23 12:09:27 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
५) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
६) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.